**महानगरपालिका (मुंबई महानगरपालिका वगळून),**
**/नगरपरिषदा/नगर पंचायती / यांच्या सेवेतील**
**महानगर पालिका व नगर परिषद/ नगर**
**पंचायती शिक्षण मंडळाच्या अधिपत्याखालील**
**प्राथमिक शिक्षकांना सुधारीत वेतन संरचना**
**लागू करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण २००९/९२५/प्र.क्र.१३७/नवि-२०
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- ३० जानेवारी २०१०.

**वाचा** : (१) शासन निर्णय वित्त विभाग क्र. वेपूर १२०९/प्र.क्र.२०/सेवा-९, दि. २७.२.२००९
(२) शासन अधिसूचना वित्त विभाग क्र.वेपूर१२०९/प्र.क्र.२७/सेवा-९,दि. २२.४.२००९
(३) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. वेपूर १२०९/प्र.क्र.६९/सेवा-९,दि. २९.४.२००९
(४) शासन निर्णय शालेय शिक्षण विभाग, क्रमांक सवेआ/१००८/(५२१/०८)/माशि-२, दि. १२ जून, २००९.
(५) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग,क्रमांक डिएसआर २००९/ प्र.क्र.६१/आस्था-०५, दिनांक २० मे, २००९.

**<u>शासन निर्णय :-</u>**

राज्य वेतन सुधारणा समिती, २००८ च्या शिफारशी शासनाने काही फेरफारसह स्विकृत करण्याचा निर्णय संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये घेतला आहे. त्या अनुषंगाने राज्य शासकीय कर्मचा-यांना दिनांक १ जानेवारी, २००६ पासून सुधारित वेतन संरचना लागू करण्याबाबत महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन ) नियम, २००९ संदर्भ क्र. २ अन्वये अधिसूचित केले आहे. तसेच या नियमानुसार प्रारंभिक वेतन निश्चितीबाबतची सविस्तर कार्यपध्दती संदर्भ क्र. ३ मधील परिपत्रकान्वये विहित करण्यात आलेली आहे. याचा आधार घेऊन राज्यातील अनुदानित अशासकीय शाळांतील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी यांना शालेय शिक्षण विभागाने संदर्भ क्र. ४ मध्ये नमूद केलेल्या शासन निर्णयानुसार सुधारित वेतनसंरचना लागु केलेल्या आहेत आणि जिल्हा परिषद सेवेतील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी यांच्यासह वर्ग ३ व वर्ग ४ च्या कर्मचा-यांना ग्राम विकास व जलसंधारण विभागाने संदर्भ क्र. ५ मध्ये नमूद केलेल्या शासन निर्णयान्वये सुधारित वेतनसंरचना लागू केलेल्या आहेत. त्याच धर्तीवर राज्यातील नगरपरिषदा व महानगरपालिका शिक्षण मंडळाच्या अखत्यारितील प्राथमिक शिक्षकांना सुधारित वेतन संरचना दिनांक ०१/०१/२००६ पासून लागू करण्याचा प्रस्ताव

शासनाच्या विचाराधीन होता. त्या अनुषंगाने शासन या आदेशाद्वारे राज्यातील नगरपरिषदा व महानगरपालिका शिक्षण मंडळाच्या अधिपत्याखालील प्राथमिक शिक्षकांना या आदेशाला जोडलेल्या अनुसूची "अ" मध्ये नमूद केल्याप्रमाणे सुधारित वेतनसंरचना लागू करण्यास मंजूरी देत आहे.

२. सुधारित वेतनसंरचनेअंतर्गत वेतन निश्चिती करण्याबाबतचे नियम संदर्भ २ येथील शासन अधिसूचना वित्त विभाग क्रमांक वेपूर-१२०९/प्र.क्र.२७/सेवा ९, दिनांक २२/०४/२००९ प्रमाणे राहतील.

३. सुधारित वेतन संरचनेत वेतन निश्चिती करण्यासाठी आवश्यक तो विकल्प हे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून १ महिन्याच्या आत देण्यांत यावा. एकदा दिलेला विकल्प अंतिम राहील.

४. या प्रमाणे सुधारित वेतनसंरचना लागू केल्यामुळे होणारा अतिरिक्त खर्च प्राथमिक शिक्षकांचे वेतन व भत्ते यावरील सध्या ज्याप्रकारे व ज्या लेखाशीर्षाखाली खर्ची घालण्यात येतो त्याच पध्दतीने त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची घालण्यात यावा व त्याखाली उपलब्ध होणा-या अनुदानातून व विहित प्रमाणानुसार संबंधित महानगरपालिका/ नगरपालिका/ नगर पंचायतीकडून प्राप्त होणा-या हिश्श्याच्या रकमेतून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय शालेय शिक्षण विभाग व वित्त विभाग यांच्या सहमतीने त्यांच्या अनुक्रमे शालेय शिक्षण विभाग अनौपचारिक संदर्भ क्र. १६३२२, दिनांक २५.०९.२००९ व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४/ सेवा-९, दि. ०१/०१/२०१० अन्वये निर्गमित करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सहपत्र - १.

( म. दि. आडिवरेकर )
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

आयुक्त, सर्व महानगरपालिका,
संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई,
सर्व जिल्हाधिकारी,
मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषदा,
अध्यक्ष, नगरपरिषदा शिक्षण मंडळे, सर्व नगरपरिषदा,
महालेखापाल, १ व २ ( लेखापरिक्षा मुंबई / नागपूर ),
महालेखापाल, १ व २ ( लेखा व अनुज्ञेयता, मुंबई / नागपूर ),
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
मुंबई लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, महाराष्ट्र राज्य, कोकण भवन, नवी मुंबई
सर्व जिल्हयांचे कोषागार अधिकारी,
निवासी लेखापरिक्षा अधिकारी, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
लेखा परिक्षक स्थानिक निधी लेखा ( मुंबई /पुणे/ नागपूर/औरंगाबाद )
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
नगर विकास विभागातील सर्व कार्यासने,
संचालक, माहिती व जनसंपर्क यांना योग्य त्या प्रसिध्दीसाठी

शासन निर्णय, नगर विकास विभाग,क्रमांक: संकीर्ण २००९/९२५/प्र.क्र.१३७/नवि-२०
दिनांक :- ३० जानेवारी २०१० चे सहपत्र.

## अनुसूचि "अ"

प्राथमिक शाळातील मुख्याध्यापक व शिक्षक यांची विद्यमान आणि सुधारित, मूळ, वरिष्ठ व निवडश्रेणी.

| अ.क्र. | पदनाम | विद्यमान वेतन श्रेणी व असल्यास, विशेष वेतन (रुपये) | सुधारित वेतन संरचना | |
|---|---|---|---|---|
| | | | वेतन बँड(रुपये) | ग्रेड वेतन (रुपये) |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | मुख्याध्यापक, केंद्रीय प्राथमिक शाळेतील प्रशिक्षित पदवीधर | ५५००-९००० अधिक २५० विशेष वेतन | ९३००-३४८०० | ४४०० |
| | | ६५००-१०५०० (वरिष्ठश्रेणी ) | ९३००-३४८०० | ४५०० |
| | | ७५००-१२००० (निवडश्रेणी २० % पदांसाठी ) | ९३००-३४८०० | ४९०० |
| २ | प्रशिक्षित पदवीधर प्राथमिक शिक्षक (बी.एड. किंवा डी.एड.सह पदवी ) | ५५००-९००० अधिक २५० विशेष वेतन | ९३००-३४८०० | ४३०० |
| | | ६५००-१०५०० (वरिष्ठश्रेणी ) | ९३००-३४८०० | ४४०० |
| | | ७५००-१२००० (निवडश्रेणी २० % पदांसाठी ) | ९३००-३४८०० | ४८०० |
| ३ | मुख्याध्यापक प्राथमिक शाळा ( २०० व अधिक विद्यार्थी पट किंवा १ ते ७ पर्यंतचे वर्ग ) | ५५००-९००० | ९३००-३४८०० | ४३०० |
| | | ६५००-१०५०० (वरिष्ठश्रेणी ) | ९३००-३४८०० | ४४०० |
| | | ७५००-१२००० (निवडश्रेणी २० % पदांसाठी ) | ९३०० ३४८०० | ४८०० |
| ४ | एस.एस.सी. किंवा तत्सम आणि पी.टी.सी. | ४५००-७००० | ५२००-२०२०० | २८०० |
| | | ५००० ८००० (वरिष्ठश्रेणी ) | ९३००-३४८०० | ४२०० |
| | | ५५००-९००० (निवडश्रेणी २० % पदांसाठी ) | ९३००-३४८०० | ४३०० |
| ५ | एस.एस.सी. आणि वरिष्ठ पी.टी.सी. ( २ वर्षे ) | ४५००-७००० | ५२००-२०२०० | २८०० |
| | | ५०००-८००० (वरिष्ठश्रेणी ) | ९३००-३४८०० | ४२०० |
| | | ५५००-९००० (निवडश्रेणी २० % पदांसाठी ) | ९३००-३४८०० | ४३०० |
| ६ | प्रशिक्षित एस.एस.सी. हिंदी शिक्षक | ४५००-७००० | ५२००-२०२०० | २८०० |
| | | ५०००-८००० (वरिष्ठश्रेणी ) | ९३००-३४८०० | ४२०० |
| | | ५५००-९००० (निवडश्रेणी २० % पदांसाठी ) | ९३००-३४८०० | ४३०० |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ७ | अप्रशिक्षित प्राथमिक शिक्षक, एस.एस.सी. उत्तीर्ण | ३२००-४९०० | ५२००-२०२०० | २००० |
| ८ | पी.एस.सी. व पी.टी.सी (२ वर्षे ) | ३२००-४९०० | ५२००-२०२०० | २००० |
| | | ४०००-६००० (वरिष्ठश्रेणी ) | ५२००-२०२०० | २४०० |
| | | ४५००-७००० (निवडश्रेणी २० % पदांसाठी ) | ५२००-२०२०० | २८०० |
| ९ | अप्रशिक्षित हिंदी शिक्षक | ३२००-४९०० | ५२००-२०२०० | २००० |
| १० | फक्त पी.एस.सी. झालेले अप्रशिक्षित प्राथमिक शिक्षक :- पी.एस.सी. धारक | ३०५०-४५९० | ५२००-२०२०० | १९०० |
| ११ | भूतपूर्व हैद्राबाद व मराठवाडा विभागाच्या मुन्शी/मॅट्रीक्युलेशन शैक्षणिक अर्हतेपेक्षा कमी अर्हता | ३०५०-४५९० | ५२००-२०२०० | १९०० |
| १२ | शासन निर्णय क्रमांक : ई ॲन्ड एस.डब्ल्यु.डी./ टीसीएम/२८६२/ए. दिनांक २८ जून १९६२ नुसार अनुभवी शिक्षक | ३०५०-४५९० | ५२००-२०२०० | १९०० |
| १३ | पी.एस.सी. अप्रशिक्षित हिंदी शिक्षक | ३०५०-४५९० | ५२००-२०२०० | १९०० |
| १४ | इतर सर्व विशेष शिक्षक (उदा. चित्रकला शिक्षक, संगीत शिक्षक, शिवणकला शिक्षक इत्यादी ) | ३०५०-४५९० | ५२००-२०२०० | १९०० |

***************